केंद्र शासनाच्या राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत अनुसूचित जमाती प्रवर्गासाठीचा सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात सन २०१९-२० वर्षातील दुसऱ्या हप्त्यापोटी प्राप्त निधी व समरुप राज्य हिस्सा निधी वितरीत करण्याबाबत.
(केंद्र हिस्सा -२५०१ २९६२), (राज्य हिस्सा - २५०१ २७९३ ),

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय, क्रमांकः बीयुडी-**२०२०**/प्र.क्र.८/कार्यासन ६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: - १३ जुलै, २०२०.

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वि. वि, क्र.अर्थसं-२०२० / प्र.क्र.६४ / अर्थ-३, दि. १६.०४.२०२०.
२) केंद्र शासन, ग्राम विकास मंत्रालय यांचे पत्र, क्र. NO.J-12025/01/2019-RL (NRLM_40C), दि.१३.१२.२०१९.
३) ग्राम विकास विभागाची नस्ती क्र.मजिअ-२०२०/ प्र.क्र.६८/ यो-३.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानाकरीता सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मागणी क्र.टी-५, २५०१-विशेष ग्राम विकास कार्यक्रम,०१-एकात्मिकृत ग्राम विकास कार्यक्रम, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, ०१-जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, (०१)(०७)-महाराष्ट्र राज्य ग्रामीण उपजिविका अभियानासाठी वित्तीय सहाय्य (केंद्र हिस्सा) (२५०१ २९६२), ३३-अर्थसहाय्य या लेखाशीर्षाखाली एकूण रू. १०७१०.०० लाख, राज्य हिश्श्याच्या (०१)(०४)- महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (२५०१ २७९३), ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली रू.७१४०.०० लाख इतकी तरतूद अर्थसंकल्पित आहे.

२. प्रस्तुत प्रकरणी ग्रामविकास विभागाच्या संदर्भीत क्र.३ येथील प्रस्तावास अनुसरुन केंद्र शासनाच्या राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानाकरीता सदर तरतुदीतून सन २०१९-२० या आर्थिक वर्षात केंद्र हिश्श्याच्या (२५०१ २९६२) या लेखाशीर्षाखाली रू.३२०३.९१ लाख ( रु. बत्तीस कोटी, तीन लाख, एक्याण्णव हजार फक्त ) इतका व त्यास समरुप राज्य हिश्श्याच्या (२५०१ २७९३) या लेखाशीर्षाखाली रू.७८६.०२७ लाख (रु.सात कोटी, श्याह्येंशी लाख दोन हजार सातशे फक्त) इतका निधी असा एकूण रु.३९८९.९३७ लाख (रु. एकोणचाळीस कोटी, एकोणनव्वद लाख, त्र्याण्णव हजार सातशे फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. नियंत्रण अधिकारी / विभागप्रमुख यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार सदर निधी याच वर्षात खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व ग्रामविकास विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

३. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात विविध योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला

जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी उपयोजना क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर लक्ष ठेवता येईल.

४. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने **वाचा** येथील क्रमांक १ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५७/२०२० अर्थोपाय, दि.०६.०५.२०२० अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७०६१७५५०७८०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2020.07.13 15:10:58 +05'30'

रविंद्र दि. औटे
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई

२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

३. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.

४. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.

५. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

६. विभागीय आयुक्त, मुंबई / नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/ अमरावती/ पुणे.

७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.

८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

०९. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१०. ग्रामविकास विभाग, योजना- ०३, मंत्रालय, मुंबई.

११. कार्यासन अधिकारी, (का. २/१७/ )/निवड नस्ती (का.६),आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.